१९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या मौ.किल्लारी, ता.औसा या लातूर जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांतील श्री. तानाजी हरीबा सुरवसे यांना ८० मीटर पट्ट्यात घराचे बांधकाम करावयास विशेष बाब म्हणून मान्यता मिळाल्याने घर बांधण्याकरीता अनुदान मंजूर करणेबाबत.

(२२४५- सहायक अनुदाने)

## महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्रमांक आव्यप्र-२००९/प्र.क्र.१२/आव्यप्र-२,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : ३० सप्टेंबर,२०२०

संदर्भ- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) क्रमांक:आव्यप्र-२०१६/ प्र.क्र.३६/आव्यप्र-२, दि.२७ एप्रिल,२०१६.
२) सम क्रमांकाचे दिनांक ११ जून, २०१९ रोजीचे शासनपत्र
३) जिल्हाधिकारी लातूर, यांचे क्र. जा.क्र.२०१२/भू.पू./कावि-३७, दि. २ मार्च २०२० रोजीचे पत्र.

प्रस्तावना :

महसूल व वन विभागाच्या दिनांक २३.०४.२००१ रोजीच्या पत्रान्वये सन १९९३ च्या भुकंपामुळे बाधित झालेल्या मौ.किल्लारी, ता.औसा, जि.लातूर या गावातील बाधित श्री. तानाजी हरिबा सुरवसे व श्री. सतिश लोहार यांना ब वर्गीय घराच्या बांधकामासाठी प्रत्येकी रु. १,०७,०४०/- एवढे घर बांधकाम अनुदान पाच हप्त्यात विशेष बाब म्हणून मंजूरी देण्यात आली होती. तथापि, घराचे बांधकाम झालेले नसल्यामुळे शासनाकडून अनुदान प्राप्त झाले नाही. श्री. तानाजी सुरवसे यांचे घराचे बांधकाम झालेले नसल्याने रु. १,८८,५००/- ही रक्कम तहसिलदार औसा यांचे बँक खात्यात जमा आहे. आतापावेतो घराच्या जागेस मान्यता नसल्याने सदर रक्कम बँकेत तशीच जमा आहे. आता श्री. सुरवसे यांच्या मागणीनुसार त्यांना त्यांच्या मालकीच्या शासनाने संपादित केलेल्या जमिनीमधील ८० मीटर पट्ट्यातील जागेमध्ये घराचे बांधकाम करुन देण्याच्या प्रस्तावास तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांनी एक विशेष बाब म्हणून मान्यता दिली असल्याने आता सदर कामाकरीता उर्वरीत अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

सन १९९३ च्या भुकंपामुळे बाधित झालेल्या मौ.किल्लारी, ता.औसा, जि.लातूर या

गावातील बाधित श्री. तानाजी हरिबा सुरवसे यांना शासन निर्णय क्र. बीजीटी २००५/प्र.क्र.१९/ भुपुक ५, दि.१९.०६.२००६ अन्वये २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य (योजनेतर) (०६)(१०१) अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च (०१) (९२) भूकंपग्रस्तांसाठी सहाय्य ३१- (सहायक अनुदाने) वेतनेतर २२४५ २४८१ या लेखाशिर्षातर्गत मौजे किल्लारी येथे ब वर्गवारीच्या घराच्या बांधकामासाठी रु.१,८८,५००/- इतके अनुदान विभागीय आयुक्तांमार्फत जिल्हाधिकारी, लातूर यांना वितरीत करण्यात आले होते.

श्री. तानाजी सुरवसे यांचे घराचे बांधकाम झालेले नसल्याने तसेच घराच्या जागेस मान्यता नसल्याने सदर रु.१,८८,५००/- ही रक्कम तहसिलदार औसा यांचे बँक खात्यात आतापावेतो तशीच जमा आहे. आता श्री. सुरवसे यांच्या मागणीनुसार त्यांना शासनाने संपादित केलेल्या त्यांच्या मालकीच्या जमिनीमधील ८० मीटर पट्ट्यातील जागेमध्ये घराचे बांधकाम करुन देण्याच्या प्रस्तावास तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांनी एक विशेष बाब म्हणून मान्यता दिली आहे. परंतु सदर कामाकरीता अंदाजित रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१८-१९ चे दरसुचीनुसार रु.६,८६,९२१ इतकी झाली आहे. सदर अंदाजित रकमेतून बँकेतील शिल्लक रक्कम रु. १,८८,५००/- वजा करता विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना लेखाशिर्ष २२४५ २४८१ अंतर्गत उर्वरीत रु. ४,९८,४२१/- (रुपये चार लक्ष अठ्ठ्याण्णव हजार चारशे एकवीस फक्त) इतकी तरतूद उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे. सदर तरतूद विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी खालीलप्रमाणे टप्प्याटप्प्याने वितरीत करावी:-

(रक्कम रुपये)

| अ.क्र. | हप्त्याचा तपशिल | बांधकामाचा टप्पा |
|---|---|---|
| १. | रु.९६,२६१/- | पाया खोदकाम पूर्ण झाल्यावर |
| २. | रु. १,६०,४३६/- | रिंगसह जोत्याचे काम पूर्ण झाल्यानंतर |
| ३. | रु.१,६०,४३६/- | लिंटिरींगसह लिंटलचे काम पुर्ण झाल्यानंतर |
| ४. | रु. १,६०,४३६/- | स्लॅब पूर्ण झाल्यानंतर |
| ५. | रु. १,०९,३५३/- | घर पूर्ण झाल्यानंतर |
| एकूण | रु. ६,८६,९२१/- | |

याबाबतीत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २ २४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणसाठी सहाय्य,०६-भुकंप,१०१-अनुग्रह सहाय्य (९२)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च (९२) (०१) भुकंपग्रस्तांसाठी सहाय्य ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ( २२४५ २४८१ )"या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

हा निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी खातरजमा करावी. ज्या प्रयोजनासाठी

निधी वितरीत करण्यात आला आहे त्याबाबतची माहिती विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी या विभागाकडे मासिक खर्चाचा अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/ नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्यावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे होणा-या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी एकत्रितपणे महसुल व वन विभागास ( कार्यासन म-११ ) न चुकता सादर करावी. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव ( मदत व पुनर्वसन ) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. तसेच कोषागारातून / उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहतीने क्रमांक: अनौ.सं.११४/व्यय-९/२०२० दिनांक २२.०६.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००९३०१६२८०६०९१९** असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सं. प्र. मेळेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
जिल्हाधिकारी, लातूर
भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, औसा, जिल्हा लातूर.
कोषागार अधिकारी, लातूर
महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)
अवर सचिव/कार्यासन अधिकारी, (ब-१/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, आव्यप्र-२.